**हिंगोली येथील राज्यस्तरीय सिंचन प्रकल्पांच्या कामासाठी विभागीय कार्यालय निर्माण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : आढावा २०१६/७७/प्र.क्र.१९०/२०१६/आ.(प्रशि.)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४ डिसेंबर, २०१६.

वाचा -

१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. ईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दि. ८/३/१९८४.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.१०९२/सीआर/८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/१९९२.
३) शासन निर्णय, पाटबंधारे विभाग, क्र. एमआयएस-१०९०/६५/९०/ आ.(क्षेप्र), दि. १/७/१९९१.
४) शासन निर्णय, जलसंपदा विभाग, क्र. आढावा-१००२/३३५/२००२/आ.(प्रशि.), दि. ६/२/२००३.

प्रस्तावना -

हिंगोली जिल्ह्यांतर्गत राज्यस्तरीय सिंचन प्रकल्पांची कामे व जिल्ह्यातील सिंचनाचा अनुशेष कमी करण्यासाठी तसेच जिल्ह्यांतर्गत कयाधू नदीवर बॅरेजेस बांधणे व पाणी उपलब्धतेचे प्रमाणपत्र प्राप्त करणे इत्यादी प्रशासकीय कामांसाठी हिंगोली जिल्ह्यात एक स्वतंत्र विभागीय कार्यालय कार्यान्वित करण्याबाबत स्थानिक लोकप्रतिनिधींची शासनाकडे मागणी होती. तसेच याच संदर्भात दि.१९ जुलै, २०१६ रोजी मुख्यसचिव यांचे अध्यक्षतेखाली हिंगोली जिल्ह्यातील स्थानिक लोकप्रतिनिधी व विभागातील अधिकाऱ्यांसमवेत संपन्न झालेल्या बैठकीत हिंगोली येथे जलसंपदा विभागाचे विभागीय कार्यालय कार्यान्वित करण्याबाबत निर्णय घेण्यात आला होता. त्यानुसार हिंगोली जिल्ह्यातील राज्यस्तरीय सिंचन प्रकल्पांच्या कामासाठी स्वतंत्र विभाग व उपविभाग कार्यालये उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार खालील प्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

**शासन निर्णय :-**

अधीक्षक अभियंता, नांदेड पाटबंधारे मंडळ, नांदेड अधिनस्त कार्यरत असलेले लघु पाटबंधारे विभाग, नांदेड हे विभागीय कार्यालय अंतर्गतच्या किनवट, कंधार व मुखेड येथील कार्यरत ३ उपविभागीय कार्यालयांसह तसेच लघु पाटबंधारे विभाग, परभणी अंतर्गतच्या हिंगोली येथे कार्यरत असलेल्या २ उपविभागीय कार्यालयांसह हिंगोली येथे कार्यान्वित करण्यासाठी हिंगोली येथे वर्ग करण्यास यान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. त्यानुसार विभागीय व उपविभागीय (१ विभाग व ५ उपविभाग) कार्यालयांचे तांत्रिक व प्रशासकीय नियंत्रण अधीक्षक अभियंता, उर्ध्व पेनगंगा प्रकल्प मंडळ, नांदेड यांच्या नियंत्रणाखाली पुढील प्रमाणे संलग्न करण्यात येत आहे.

| अ. क्र. | स्थलांतरीत करावयाच्या कार्यालयाचे नाव व मुख्यालय (बदला पूर्वीचे नाव) | स्थलांतरीत करण्यात आलेल्या कार्यालयाचे नाव व मुख्यालय (बदलानंतरचे नाव) |
|---|---|---|
| १ | लघु पाटबंधारे विभाग, नांदेड (बांधकाम) | लघु पाटबंधारे विभाग, हिंगोली (बांधकाम) |
| १.१ | लघु पाटबंधारे उपविभाग, किनवट (बांधकाम) | लघु पाटबंधारे उपविभाग, कळमनुरी, जि.हिंगोली (बांधकाम) |
| १.२ | लघु पाटबंधारे सर्वेक्षण उपविभाग, कंधार (बांधकाम) | लघु पाटबंधारे उपविभाग, वसमत, जि.हिंगोली (बांधकाम) |
| १.३ | लघु पाटबंधारे उपविभाग, मुखेड (बांधकाम) | लघु पाटबंधारे उपविभाग, औंढा, जि.हिंगोली (बांधकाम) |
| १.४ | लघु पाटबंधारे सर्वेक्षण उपविभाग, हिंगोली (बांधकाम) | लघु पाटबंधारे सर्वेक्षण उपविभाग, हिंगोली (बांधकाम) |
| १.५ | लघु पाटबंधारे उपविभाग, हिंगोली (बांधकाम) | लघु पाटबंधारे उपविभाग, हिंगोली (बांधकाम) |

३. स्थलांतरीत होणाऱ्या विभाग व उपविभाग कार्यालयांकडील उर्वरित कार्यभार व कार्यालयीन अभिलेख पुढीलप्रमाणे वर्ग/ संलग्न करण्यात येते आहे.

३-१. लघु पाटबंधारे विभाग, नांदेड या विभागीय कार्यालयांतर्गतचा उर्वरित कार्यभार व कार्यालयीन अभिलेख विष्णुपूरी प्रकल्प विभाग क्र.२, नांदेड अंतर्गत वर्ग/ संलग्न करण्यात येत आहे.

३-२. लघु पाटबंधारे उपविभाग, किनवट या उपविभागीय कार्यालयांतर्गतचा उर्वरित कार्यभार व कार्यालयीन अभिलेख मध्यम प्रकल्प उपविभाग क्र.२, किनवट अंतर्गत वर्ग/ संलग्न करण्यात येत आहे.

३-३. लघु पाटबंधारे सर्वेक्षण उपविभाग, कंधार या उपविभागीय कार्यालयांतर्गतचा उर्वरित कार्यभार व कार्यालयीन अभिलेख विष्णूपूरी प्रकल्प विभाग क्र.२, नांदेड अंतर्गतच्या विष्णुपूरी प्रकल्प उपविभाग क्र.५, कंधार अंतर्गत वर्ग / संलग्न करण्यात येत आहे.

३-४. लघु पाटबंधारे उपविभाग, मुखेड या उपविभागीय कार्यालयांतर्गतचा उर्वरित कार्यभार व कार्यालयीन अभिलेख लेंडी प्रकल्प विभाग, देगलूर अंतर्गतच्या लेंडी प्रकल्प उपविभाग क्र.५, मुखेड अंतर्गत वर्ग / संलग्न करण्यात येत आहे.

३-५. लघु पाटबंधारे विभाग, परभणी अंतर्गतच्या लघु पाटबंधारे सर्वेक्षण उपविभाग, हिंगोली व लघु पाटबंधारे उपविभाग, हिंगोली या दोन उपविभागीय कार्यालयांतर्गतचा संपूर्ण कार्यभार व कार्यालयीन अभिलेख यान्वये हिंगोली मुख्यालयी नव्याने कार्यान्वित होणाऱ्या विभागीय कार्यालयांतर्गत वर्ग / संलग्न करण्यात येत आहे.

४. लघु पाटबंधारे विभाग, नांदेड या विभागीय कार्यालयाच्या स्थलांतरणामुळे विभागांतर्गतच्या उर्वरित ३ उपविभागीय कार्यालयांच्या विभागीय नियंत्रणात पुढील प्रमाणे बदल करण्यात येत आहेत.

४-१. पाटबंधारे प्रकल्प अन्वेषण उपविभाग क्र.२, भोकर हे उपविभागीय कार्यालय लघु पाटबंधारे उपविभाग, पुर्णा या नावाने लघु पाटबंधारे विभाग, परभणी या विभागीय कार्यालयाच्या नियंत्रणाखाली अस्तित्वातील कार्यभारासह संलग्न करण्यात येत आहे.

४-२. लघु पाटबंधारे उपविभाग, देगलूर हे उपविभागीय कार्यालय लेंडी प्रकल्प विभाग, देगलूर या विभागीय कार्यालयाच्या नियंत्रणाखाली अस्तित्वातील कार्यभार व त्याच नावाने संलग्न करण्यात येत आहे.

४-३. मध्यम प्रकल्प उपविभाग क्र.२, किनवट हे उपविभागीय कार्यालय विष्णुपूरी प्रकल्प विभाग क्र.२, नांदेड या विभागीय कार्यालयाच्या नियंत्रणाखाली अस्तित्वातील कार्यभारासह त्याच नावाने संलग्न करण्यात येत आहे.

५. वरीलप्रमाणे होणारे बदल पुढील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

अ) स्थलांतरीत होणाऱ्या विभाग व उपविभागीय कार्यालयांची मंजूर पदे संबंधित मंडळ/ विभाग कार्यालयास प्रपत्र-१ मध्ये नमूद केल्यानुसार वर्ग करण्यात यावी.

आ) स्थलांतरीत होणारी कार्यालये शासकीय जागेतच कार्यान्वित करावीत, त्यासाठी बांधकामाचा वेगळ्याने खर्च करु नये. तसेच सध्याच्या कार्यरत विभाग/ उपविभागांतील उपलब्ध साहित्याचाच वापर करण्यात यावा. प्रशासकीय व आस्थापना खर्चात वाढ होणार नाही याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनावर कोणताही आर्थिक भार पडणार नाही.

५. वित्त विभाग, शासन निर्णय, क्रमांक ईआरडब्ल्यू -१०८३/ सीआर - ६११/८३/ एडीएम-९, दि. ०८ मार्च, १९८४ मधील तरतूदीनुसार लघु पाटबंधारे विभाग, हिंगाली या विभागीय कार्यालयाचे कार्यकारी अभियंता यांना “आहरण व संवितरण अधिकारी” व उर्ध्व पेनगंगा प्रकल्प मंडळ, नांदेड या मंडळ कार्यालयाचे अधीक्षक अभियंता यांना या कार्यालयांचे “नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. या प्रकरणी होणारा खर्च “४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च” या प्रधान लेखाशीर्षाखाली अधीक्षक अभियंता, उर्ध्व पेनगंगा प्रकल्प मंडळ, नांदेड या मंडळ कार्यालयाच्या मंजूर अनुदानातून भागवावा.

७. स्थलांतरीत/ वर्ग होणारी कार्यालये मुख्य अभियंता (जलसंपदा), जलसंपदा विभाग, औरंगाबाद या प्रादेशिक विभागांतर्गतच्या अधीक्षक अभियंता, उर्ध्व पेनगंगा प्रकल्प मंडळ, नांदेड यांच्या नियंत्रणाखाली दिनांक ०१.०१.२०१७ पासून कार्यान्वित होतील याद्दष्टीने कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांनी आवश्यक ती सर्व कार्यवाही करावी. तसेच दिनांक २८.०२.२०१७ पर्यंत वेतनाबाबत सध्याचीच कार्यपध्दती चालू ठेवण्यात यावी.

८. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक १०९२/सीआर-८०६/व्यय-६, दिनांक १५.१०.१९९२ मधील तरतूदींनुसार विभागास प्रदान केलेल्या प्रधिकारानुसार व आंतर वित्त सल्लागार व उपसचिव यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१६१२१४१७०४१५००२७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vijay Karbhari Chaudhari
Date: 2016.12.14 17:07:18 +05'30'

**( वि.का.चौधरी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव.
४. मा.मंत्री (खारभूमी) यांचे खाजगी सचिव.
५. मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक.
६. मा.विधानपरिषद/ विधानसभा सदस्य (सर्व).
७. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई यांचे उपसचिव.
८. प्रधान सचिव (जसंप्र व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य, (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
१२. महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य, (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
१३. संचालक लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१४. सर्व महासंचालक / सर्व कार्यकारी संचालक, महामंडळ कार्यालये, जलसंपदा विभाग.
१५. गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, जलसंपदा विभाग, औरंगाबाद.
१६. सहसचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. सर्व मुख्य अभियंता व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. मुख्य अभियंता (जलसंपदा), जलसंपदा विभाग, औरंगाबाद.
१९. आंतर वित्तीय सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. उपसचिव (प्रशासन) / (आस्थापना), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२१. सर्व मुख्य अभियंता / सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२२. अधीक्षक अभियंता, नांदेड पाटबंधारे मंडळ, नांदेड.
२३. अधीक्षक अभियंता, उर्ध्व पेनगंगा प्रकल्प मंडळ, नांदेड.
२४. अधीक्षक अभियंता, ई-प्रशासन मंडळ, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

२५. कार्यकारी अभियंता, प्रशासन संगणकीकरण विभाग, पुणे. यांना विभागीय व उपविभागीय कार्यालयांच्या नावात, मुख्यालयात व मंडळीय नियंत्रणात झालेल्या बदलाबाबतची आवश्यक ती नोंद घेण्यास्तव.

२६. सर्व कार्यासने जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.

२७. आस्थापना (प्रशिक्षण) संग्रहार्थ/ निवडनस्ती.

**शासन निर्णय क्रमांक - आढावा-२०१६/प्र.क्र.१९०/२०१६/आ.(प्रशि.), दि. १४ डिसेंबर, २०१६ सोबतचे**

**प्रपत्र-१**

लघु पाटबंधारे विभाग, हिंगोली व त्यांतर्गतच्या ५ उपविभागीय कार्यालयांसाठी नांदेड पाटबंधारे मंडळ, नांदेड अंतर्गतची वर्ग करावयाची मंजूर पदसंख्या.

| अ.क्र. | पदनाम | विभाग | उपविभाग | एकूण |
|---|---|---|---|---|
| १ | कार्यकारी अभियंता | १ | ० | १ |
| २ | उप कार्यकारी अभियंता (उप अभियंता) | १ | ५ | ६ |
| ३ | कनिष्ठ अभियंता/ शाखा अभियंता/ सहायक अभियंता श्रेणी-२ | ४ | २० | २४ |
| ४ | विभागीय लेखापाल | १ | ० | १ |
| ५ | निम्नश्रेणी लघुलेखक | १ | ० | १ |
| ६ | प्रथम लिपिक | १ | ० | १ |
| ७ | भांडारपाल | १ | ० | १ |
| ८ | आरेखक | १ | ० | १ |
| ९ | सहायक आरेखक | १ | ० | १ |
| १० | अनुरेखक | ० | ५ | ५ |
| ११ | स्थापत्य अभियांत्रिकी सहायक | ० | २० | २० |
| १२ | वरिष्ठ लिपिक | ५ | ५ | १० |
| १३ | कनिष्ठ लिपिक | ४ | १० | १४ |
| १४ | लिपिक-टंकलेखक/ टंकलेखक | ३ | ५ | ८ |
| १५ | संगणक | १ | ० | १ |
| १६ | सहायक भांडारपाल | १ | ० | १ |
| १७ | वाहनचालक | १ | ५ | ६ |
| १८ | नाईक | १ | ० | १ |
| १९ | शिपाई | ५ | १० | १५ |
| २० | चौकीदार | १ | ५ | ६ |
|  | **एकूण** | **३४** | **९०** | **१२४** |

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vijay Karbhari Chaudhari
Date: 2016.12.14 17:07:36 +05'30'

(वि.का.चौधरी)

अवर सचिव, महाराष्ट्र शासन